राज्यातील ग्रामीण व नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घ्यावयाच्या उपाययोजनांबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र. १९१/पापु-१४**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीखः २७ नोव्हेंबर, २०१८

**वाचा :-**

१) **शासन निर्णय, पा.पु. व स्व. वि., क्रमांकः टंचाई ३०९९/प्र.क्र.१३/पापु-१४, दिनांक १ फेब्रुवारी, १९९९.**
२) **शासन निर्णय, पा.पु. व स्व. वि., क्रमांकः टंचाई २०९९/प्र.क्र.१४/पापु-१४, दिनांक २ फेब्रुवारी, १९९९.**
३) **शासन निर्णय, पा.पु. व स्व. वि., क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु-१४, दिनांक ३ फेब्रुवारी, १९९९.**
४) **शासन निर्णय, पा.पु. व स्व. वि., क्रमांकः टंचाई २००८/प्र.क्र.१४९/पापु-१४, दिनांक २१ ऑगस्ट, २००९.**
५) **शासन निर्णय, पा.पु. व स्व. वि., क्रमांकः टंचाई २०१४/प्र.क्र.४८/पापु-१४, दिनांक ६ मे, २०१४.**
६) **शासन परिपत्रक, पा.पु. व स्व. वि., क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र. २०/पापु-१४, दिनांक १४ फेब्रवारी, २०१८.**

**परिपत्रक :-**

राज्यात या वर्षी असमाधानकारक पाऊस झाला आहे. त्यामुळे राज्यातील काही जिल्ह्यांत या वर्षी तीव्र पाणी टंचाई भासण्याची शक्यता आहे. यासंदर्भात, शासनाने पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ ग्रामीण/नागरी क्षेत्रात घ्यावयाच्या उपाययोजनांकरीता वेळोवेळी स्थायी आदेशांव्दारे सविस्तर सूचना दिलेल्या आहेत. यावर्षी राज्यातील संभाव्य पिण्याच्या पाण्याच्या टंचाईस तोंड देण्यासाठी उपाययोजना पूर्ण करताना तसेच योजनेचा निधी वितरित करताना सुसूत्रता येण्याच्या दृष्टीने विभागीय आयुक्त स्तरावर तसेच जिल्हाधिकारी यांना खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत:-

१) टंचाई अंतर्गत घेण्यात आलेल्या उपाययोजनांसाठी निधी वितरित करताना योजनेच्या सुरुवातीस ५०% निधी वितरित करावा तसेच योजना पूर्ण झाल्यानंतर उर्वरित ५०% निधी द्यावा, अशी अट योजनेच्या प्रशासकीय मंजूरीमध्ये नमूद करण्यात आलेली आहे. तथापि टंचाई अंतर्गत घेण्यात आलेल्या उपाययोजनांसाठी निधी वितरित करताना योजनेच्या सुरुवातीस ५०% निधी वितरित करावा. तथापि उर्वरित निधी योजनेच्या आवश्यकतेनुसार तसेच झालेल्या प्रगतीच्या अनुषंगाने विभागीय आयुक्तांनी प्रकरणनिहाय आढावा घेऊन योजनेच्या एकूण खर्चाच्या ८० टक्के रक्कम योजना पूर्ण होण्यापूर्वी, योजना मुदतीत, टंचाई कालावधीतच पूर्ण करुन पाणी पुरवठा सुरु होण्याच्या दृष्टीने निधी संबंधितांना वितरित करण्याबाबतचा निर्णय घ्यावा.

२) तसेच शासन स्तरावरुन विभागीय आयुक्तांना निधी वितरित करताना जिल्हाधिकाऱ्यांच्या मागणीच्या अनुषंगाने उपाययोजनानिहाय निधी वितरित करण्यात आला असला तरी सदर निधी अन्य उपाययोजनांसाठी अथवा त्यांच्या विभागातील अन्य जिल्हयांसाठी उपयोगात आणण्यासाठी शासनाची पूर्व परवानगी घेण्याची आवश्यकता नाही. याबाबत विभागीय आयुक्तांनी विचारपूर्वक निर्णय घेऊन त्याप्रमाणे संबंधित जिल्हाधिकाऱ्यांना परवानगी द्यावी व त्याप्रमाणे शासनास कळविण्यात यावे.

३) शासनस्तरावरुन टंचाई अंतर्गत प्राप्त झालेला निधी प्राधान्याने विहिर अधिग्रहणाची देयके अदा करण्यासाठी वितरीत करणे आवश्यक आहे. कोणत्याही परिस्थितीत विहिर अधिग्रहणाची देयके प्रलंबित राहु नयेत. सदर विहिर अधिग्रहणाची देयके एक महिन्याच्या कालावधीत प्रदान होणे आवश्यक आहे, याबाबतची दक्षता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी घेणे आवश्यक आहे.

४) तसेच टंचाई अंतर्गत घेण्यात येणाऱ्या नागरी तथा ग्रामीण उपाययोजनांना शासन स्तरावरुन अथवा जिल्हाधिकारी स्तरावरुन प्रशासकीय मंजूरी देण्यात येते. तथापि अशा योजनांबाबत काही वाद-विवाद उत्पन्न झाल्यास विभागीय आयुक्तांनी आवश्यकतेनुसार संबंधित जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तसेच संबंधित अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, यांच्याशी विचारविनिमय करुन याबाबतचा उचित निर्णय घ्यावा. असा विभागीय आयुक्तांनी घेतलेला निर्णय अंतिम असेल. अशा प्रकरणी शासन स्तरावर प्रस्ताव पाठवून योजना पूर्ण करण्यास अथवा योजनेची देयके अंतिम करण्यास अनावश्यक विलंब करण्यात येऊ नये.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२७१५३२१९१९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang Rawaji Khotare

Digitally signed by Pandurang Rawaji Khotare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f71ac87a049de582c5d577413de65742dfc38429fe3ee979d9ff3651730674c, serialNumber=241eb93ab449def8114b5fbff2ea51ab0f16e0092f0102aa9502d0457228dd65, cn=Pandurang Rawaji Khotare
Date: 2018.11.28 12:27:23 +05'30'

**(पां. रा. खोटरे)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२,
५. प्रधान सचिव, वित्त विभाग/नियोजन विभाग व ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. सचिव, महसूल व वनविभाग (मदत व पुर्नवसन), मंत्रालय, मुंबई-३२,
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
८. विभागीय आयुक्त (सर्व),
९. जिल्हाधिकारी (सर्व),
१०. जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व),
११. कार्यकारी अभियंता (सर्व) ग्रामीण पाणी पुरवठा /जि.प.,
१२. निवड नस्ती (पापु-१४).